**लोक आवास योजना व वाल्मिकी आंबेडकर आवास योजना या योजनांच्या लाभार्थ्यांना मोजणी फी माफ करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन,**

महसूल व वन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक - संकिर्ण १००१/१००८/प्र.क्र.२१५/ल-१,
मंत्रालय, दिनांक : ४/१२/२००२

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाकडून राष्ट्रीय झोपडी सुधार कार्यक्रमांतर्गत प्राप्त होणाऱ्या अनुदानातून मागासवर्गीय व दुर्बल घटकांसाठी लोक आवास योजना व वाल्मिकी आंबेडकर आवास योजना यासारख्या घरबांधणी व निवारा योजना राज्यात राबविण्यात येत आहेत. या योजनेतील लाभार्थी हे आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील व मागासवर्गीय असल्याने घराच्या किमती त्यांच्या आवाक्यातील असाव्यात म्हणून घरांच्या किंमती कमी ठेवण्यात आल्या आहेत. त्यावर शासनाकडून आकारण्यात येत असलेले विविध प्रकारचे शुल्क व फी आकारल्यास लाभार्थी ते अदा करु शकणार नाहीत म्हणून राज्य मंत्रीमंडळाने दिनांक ४.९.२००२ च्या बैठकीत याबाबत गृह निर्माण विभागाने सादर केलेल्या प्रस्तावावर विचार करुन विविध प्रकारचे शुल्क माफ करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-**

मागासवर्गीय व आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील लाभार्थीसाठी घर बांधणी व निवारा योजना कार्यान्वीत होण्याच्या दृष्टीने या योजनेतील लाभार्थींवर खर्चाचा अतिरिक्त भार पडू नये म्हणून लोक आवास योजना व वाल्मिकी आंबेडकर आवास योजना या योजनांच्या लाभार्थ्यांना मोजणी फी माफ करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

हा शासन निर्णय राज्य मंत्रीमंडळाने दिनांक ४.९.२००२ च्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

सही/-

**(विकास देशमुख)**

उप सचिव,
महसूल व वन विभाग,
महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) प्रधान सचिव, (मदत व पुनर्वसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
३) प्रधान सचिव (१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) जमावबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) सर्व जिल्हाधिकारी,
७) सर्वउप संचालक, भूमि अभिलेख,
८) सर्व अधिक्षक भूमि अभिलेख,
९) सर्व कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०)निवड नस्ती ल-१, सिन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

................

क्रमांक : संकिर्ण २००४/आरआर २५९८/गृनिधो-१
गृहनिर्माण विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १७.१२.२००२

महसुल व वन विभागाचा दिनांक ४.१२.२००२ चा उपरोक्त शासन निर्णय माहिती तथा उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित.

(र.सि.कवळे)
कक्ष अधिकारी.

प्रत,

१) सर्व विभागीय आयुक्त,
२) सर्व महानगरपालिका, आयुक्त,
३) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा,
४) मुख्य कार्यकारी अधिकरी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण,गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई - ४०० ०५१
५) मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई - ४०० ०५१
६) मुख्य अधिकारी, मुंबई/कोकण/नागपूर/औरंगाबाद/पुणे/नाशिक/अमरावी, गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ.

.......)))))(((((.........